**“मिरा-भाईंदर-वसई-विरार”**
**पोलीस आयुक्तालयाचे कामकाज**
**सुरू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ०३१६/प्र.क्र.१०४/पोल-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२०

वाचा :-

**१) गृह विभाग,शासन निर्णय क्र.अेपीओ-०३१६/प्र.क्र.१०४/पोल-३,दि.१३.०९.२०१९.**
**२) अपर पोलीस महासंचालक (नि व स),पोलीस महासंचालक कार्यालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/मिरा-भाईंदर-वसई-विरार/१०३/२०१५, दि.१७.०९.२०२०.**

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.१३.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये पोलीस अधीक्षक, ठाणे ग्रामीण व पोलीस अधीक्षक, पालघर यांच्या कार्यक्षेत्राचे विभाजन करुन, “मिरा-भाईंदर-वसई-विरार” परिसराकरीता स्वतंत्र “मिरा-भाईंदर-वसई-विरार”पोलीस आयुक्तालय निर्माण करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद केल्याप्रमाणे “मिरा-भाईंदर-वसई-विरार”पोलीस आयुक्तालयाचे प्रत्यक्ष कामकाज सुरू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

पोलीस अधीक्षक, ठाणे ग्रामीण व पोलीस अधीक्षक, पालघर यांच्या कार्यक्षेत्राचे विभाजन करुन, “मिरा-भाईंदर-वसई-विरार” परिसराकरीता निर्माण करण्यात आलेल्या “मिरा-भाईंदर-वसई-विरार”पोलीस आयुक्तालयाचे कामकाज दि.०१.१०.२०२० पासून प्रत्यक्ष सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१३१२०३९१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2020.09.30 13:14:38 +05'30'

**(दिनेश सस्ते)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री, गृह यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/ठाणे.
१४. सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक.
१५. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
१६. पोलीस अधीक्षक, सर्व जिल्हे.
१७. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
२०. वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
२१. निवडनस्ती कार्यासन पोल-३.